जिंतुर पंचायत समिती (जि.परभणी) येथील अधिकारी व कर्मचारी यांचेसाठी निवासस्थान इमारत बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः** पंसई-२०१९/प्र.क्र.१३४/बांधकाम-४

५ वा मजला, मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१

तारीख : ०६ जानेवारी, २०२०

**वाचा:-**

१. **कार्यकारी अभियंता (बांध), जिल्हा परिषद, परभणी यांचे पत्र क्रमांकः** जिप.बांध. ताशा-१/कावी/५९८/२०१९, दिनांक १६ सप्टेंबर, २०१९.
२. **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांचे पत्र क्रमांकः** जिप बांध/तां.शा-५२०२/२०१९, दिनांक २८ नोव्हेंबर, २०१९.
३. **शासन परिपत्रक क्रमांक :** ग्राम विकास विभाग क्र.योजना-२०१९/प्र.क्र.१३६/बांध-४, दिनांक १८ नोव्हेंबर, २०१९.

**प्रस्तावना:-**

कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, परभणी व अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांनी उपरोक्त वाचा मधील अनुक्रमांक १ व २ येथील पत्रांन्वये जिंतुर पंचायत समिती, जिल्हा परभणी येथे पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाचा प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रस्तावानुसार एकूण २३२१.२९ चौ.मी. इतक्या क्षेत्रफळाची एकूण ३२ निवासस्थाने, सर्वे क्रमांक व गट क्रमांक १२९/४/६ मध्ये बांधण्याचे प्रस्तावित आहे. त्यामुळे पंचायत समिती जिंतुर यांच्या मागणी व गरजेनुसार टाईप I प्रकारातील ४, टाईप II प्रकारातील १६, टाईप III प्रकारातील ८ व टाईप IV प्रकारातील ४ निवासस्थानांच्या बांधकामाचा प्रस्ताव सादर केला आहे.

०२. कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद परभणी यांनी जिंतुर पंचायत समिती निवासस्थान बांधकामाकरीता उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां. वि., नागपूर यांच्या कडील नमुना नकाशा टाईप- I, II, III व IV जॉब क्र. टी-डीएएन/आरईएस-१८,१९, २० व २१ उपयोगात आणला आहे. यासाठी सन २०१९-२० च्या दरसूचीवर आधारीत एकूण रू. ९०३.१८ लक्ष किंमतीचे अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद, परभणी यांनी साक्षांकीत केले आहे. प्रस्तावासोबत नमुना नकाशा, सविस्तर अंदाजपत्रक, जागेचा उतारा, पंचायत समितीचा ठराव, जिल्हा परिषदेचा ठराव, टाईप प्लॅन, अस्तित्वातील इमारत बांधकामाचे फोटो इ. कागदपत्रे सादर केली आहेत.

०३. कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, परभणी व अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या छाननी अंती, जिंतुर पंचायत समिती येथील पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप I प्रकारातील ४, टाईप II प्रकारातील १६, टाईप III प्रकारातील ८ व टाईप IV प्रकारातील ४ अशा एकूण ३२ निवासस्थान बांधकामाच्या एकूण रू.९,०३,१८,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

पंचायत समिती जिंतुर, जिल्हा परभणी येथील अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप I प्रकारातील ४, टाईप II प्रकारातील १६, टाईप III प्रकारातील ८ व टाईप IV प्रकारातील ४ निवासस्थाने, अशा एकूण ३२ निवासस्थानांच्या बांधकामाच्या एकूण ९,०३,१८,०००/- (रूपये नऊ कोटी तीन लक्ष अठरा हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. जिंतुर पंचायत समिती, जिल्हा परभणी येथील पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप I प्रकारातील ४, टाईप II प्रकारातील १६, टाईप III प्रकारातील ८ व टाईप IV प्रकारातील ४ निवासस्थानांच्या इमारतींचे बांधकाम ज्या जागेवर करावयाचे आहे, ती जागा प्रथमत: जिल्हा परिषद/पंचायत समितीच्या स्वत:च्या नावावर करून घेणे बंधनकारक राहील.
२. नियोजित निवासस्थान इमारतीचे बांधकाम जुनी इमारत पाडून करावयाचे असल्यास, बांधकाम सुरू करण्यापुर्वी संबंधित अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, प्रादेशिक विभाग यांच्याकडून प्रथमत: अस्तित्वातील जुन्या इमारतीचे स्ट्रक्चरल ऑडीट करून घेण्यात यावे, त्यानुसार अस्तित्वातील इमारत वापरण्यास अयोग्य असावी.
३. जिंतुर पंचायत समिती, जिल्हा परभणी येथील पंचायत समितीच्या अधिकारी व कर्मचारी निवासस्थान इमारत बांधकामाच्या टाईप I प्रकारातील ४, टाईप II प्रकारातील १६, टाईप III प्रकारातील ८ व टाईप IV प्रकारातील ४ बांधकामाकरीता, प्रस्तावित करण्यात आलेल्या आराखड्यास बांधकाम सुरू करण्यापुर्वी प्रथमत: मुख्य वास्तुशास्त्रज्ञ/प्रादेशिक उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ यांची मान्यता घेणे तसेच अग्निशमन यंत्रणेची मंजूरी घेणे आवश्यक राहील.
४. विहीत नमुना आराखड्यानुसार कामे हाती घेताना, स्थानिक नगररचना प्राधिकरणाची मंजुरी घेणे बंधनकारक राहील.
५. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास प्रथमत: सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेणे बंधनकारक राहील.
६. प्रस्तुत निवासी इमारत बांधकामामध्ये ग्रीन बिल्डींग संकल्पना अंमलात आणून, नैसर्गिक प्रकाशयोजना व वायुवीजन, पाण्याच्या व उर्जेच्या वापरात काटकसर, पर्जन्य

जलपुन:र्भरण आणि जास्तीत जास्त पर्यावरणपूरक बांधकाम साहित्य व साधन-सामुग्रीचा वापर करणे आवश्यक राहील.

७. प्रत्यक्ष बांधकाम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८. प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे नियोजन करुन, इमारत बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

९. या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबंधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी. या कामावर प्रशासकीय मान्यतेपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो सबंधित पंचायत समिती/जिल्हा परिषदेने सोसावा.

०२. जिंतुर पंचायत समिती, जिल्हा परभणी येथील निवासी इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे:-

| **General Abstract for Construction of Government Quarters Type I, II, III & IV at P. S. Jintur, Dist. Parbhani** | | |
|---|---|---|
| **Sr.No.** | **Description of item** | **Cost In Rs.** |
| 1 | Cost of Type I Quarter 4 No. (G.F.4 nos one Bdg) | 8248053.00 |
| 2 | Cost of Type II Quarter 16 No. (G.F.+ 1 Two Bdg) | 26609468.00 |
| 3 | Cost of Type III Quarter 8 No. (G.F.+ 1 Two Bdg) | 17325929.00 |
| 4 | Cost of Type IV Quarter 4 No. (G.F.4 nos one Bdg) | 6817315.00 |
| | **Total (1 to 4)** | 59000765.00 |
| 5 | Add cost of Compound Wall | 3175626.00 |
| 6 | Add cost of Internal Road | 2674332.00 |
| 7 | Add 13 % Internal Electrification including M.S.E.B.S. | 7670099.45 |
| 8 | Add 7 % Water Supply Sanitation | 4130053.55 |
| 9 | Add For Bore well and Connection | 295003.83 |
| 10 | Add 1 % for Rain Water Harvesting System | 590007.65 |
| 11 | Add Price Variation Cost | 2000000.00 |
| 12 | Add 0.5 % for Work charge Establishment | 295003.83 |
| 13 | Add 0.5 % for Contengies | 295003.83 |
| 14 | Add Fire Fighting arrangement | 500000.00 |
| 15 | Add 1/2 % Insurance | 387679.44 |
| 16 | Add 12 % G.S.T. on Total Amt. | 9304306.50 |
| | **Total (5 to 16)** | 31317116.08 |
| | **Grant Total** | 90317881.08 |
| | **Says Rs.** | **9,03 18,000/-** |

०३. या कामाच्या सविस्तर अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकाऱ्याकडून त्वरेने तांत्रिक मान्यता घेण्यात येवून त्याची प्रत शासनास सादर करावी.

०४. प्रस्तुत कामाची माहिती कंस्ट्रक्शन ट्रॅकर प्रणालीवर अद्ययावत करावी.

०५. उपरोक्त कामासाठी वाचा मधील अनुक्रमांक ३ येथील दिनांक १८ नोव्हेंबर, २०१९ रोजीच्या शासन परिपत्रकानुसार निधीची मागणी Liability Register System (LRS) प्रणालीद्वारे करण्यात यावी व सदर परिपत्रकातील निर्देशानुसार, निधीच्या उपलब्धतेनुसार Liability Register System (LRS) प्रणालीद्वारे निधी वितरीत करण्यात येईल. या कामावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०५) जिल्हा परिषदांच्या निवासी इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने- (२५१५ १२५६)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

०६. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ खाली, प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००१०४१७१३५४२८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA NATHA SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, postalCode=400032, street=MANTRALAYA , MUMBAI, serialNumber=f049989dbbef93340e9edd88af960a0963746d42baa5c948405b62e821529a99, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJENDRA NATHA SAVANE
Date: 2020.01.06 18:10:10 +05'30'

**(रा. ना. सवने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/ विधानपरिषद
२) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
५) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) विभागीय आयुक्त औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
८) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२ नागपूर
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी
१०) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी
११) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी

१२) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, परभणी
१३) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा परभणी
१४) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
१५) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
१६) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, परभणी
१७) सभापती, पंचायत समिती, जिंतुर, जिल्हा परभणी
१८) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, जिंतुर, जिल्हा परभणी
१९) निवड नस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग,मंत्रालय मुंबई.